

ल्येव तल्स्तोय

# मुलांसाठी गोष्टी

ल्येव तल्स्तोय

# मुलांसाठी गोष्टी

चित्रकारः पाखोमोव



प्रगती प्रकाशन
मॉस्को



# मांजरीचे पिलू

दोघे होती भावंडे! भावाचे नांव होते वास्या आणि बहिणीचे नांव होते कात्या. त्यांचे एक मांजर होते. एकदा वसंत ऋतूच्या दिवसांत ते हरवले. मुलांनी सगळीकडे खूप शोध शोध शोधले; पण कुठेच पत्ता लागेना.

एके दिवशी ती मुले कणगीपाशी खेळत होती; तो वरून कुठून तरी बारीकसे आवाज आले—"म्हांउ." त्याबरोबर वास्या शिडीवर चढला आणि कणगीच्या आढ्यावर गेला. कात्या खालीच उभी राहिली.



“वास्या! सापडली का रे आपली मनी?” तिने विचारले.

प्रथम वास्याने काहीच उत्तर दिले नाही. पण नंतर तो वरूनच तिला म्हणाला, “सापडली ग सापडली! अग! आपलीच मनी आहे ती! .. आणि तिला चिंगुली बाळे झाली आहेत! किती ग छान आहेत ती! ये वर! लवकर!”

कात्याने घराकडे धूम ठोकली आणि मांजरीसाठी थोडे दूध आणले.

एकंदर पाच पिले होती. ती जराशी मोठी होऊन अवती भोवती फिरायला लागल्यावर मुलांनी त्यातले एक पिलू उचलले आणि घरी आणले. त्याचा रंग कसा छान करडा होता

आणि त्याचे पंजे पांढरेशुभ्र होते. त्यांच्या आईने बाकीची सगळी पिले शेजाऱ्यापाजाऱ्यांना देऊन टाकली; पण हे एवढे पिलू मात्र मुलांसाठी ठेवून घेतले. मुले त्याला खाऊ पिऊ घालीत त्याच्याबरोबर खेळत आणि त्याला कुशीत घेऊन झोपत.

एकदा काय झाले, मुले रस्त्यावर फिरायला गेली. बरोबर त्यांनी आपल्या पिलालाही घेतले.





रस्त्यावर वाऱ्याने गवत भुरूभुरू उडत होते. पिलू गवताशी खेळायला लागले, मुलांना खूप गंमत वाटली. तेवढ्यात त्यांना रस्त्याच्या कडेला चुक्याची भाजी उगवलेली दिसली. मुले भाजी वेचायला लागली आणि त्यातच रंगून गेली, आणि मग त्यांना आपल्या पिलाची आठवणही राहिली नाही.

तेवढ्यात एकाएकी त्यांना कोणीतरी ओरडल्याचा आवाज ऐकू आला, "मागे फिरा! फिरा मागे!" त्यांनी वळून पाहिले तो एक शिकारी घोड्यावर स्वार होऊन चालला होता आणि दोन कुत्रे त्याच्यापुढे धावत होते – मांजराचे पिलू त्यांच्या दृष्टीस पडले होते आणि ते त्याच्या



अंगावर उडचा घेण्याच्या बेतात होते. ते वेडे पिलू पाठीची कमान करून कुत्र्यांकडे लढाईचा पवित्रा घेऊन रागाने पहात उभे राहिले.

कात्या कुत्रे पाहून किंचाळली आणि दूर पळाली. पण वास्या मात्र शक्य तितक्या जोराने धावत पिलाजवळ गेला—कुत्रे पिलाजवळ पोहोचले, नेमका त्याच वेळेला तोही तेथे पोहोचला.

कुत्रे पिलाला उचलण्याच्या बेतात होते, त्याबरोबर वास्याने त्याच्या अंगावर वाकून आपली ढाल केली.

तेवढचात शिकारी पण दौडत आला आणि त्याने कुत्र्यांना दूर पिटाळले. वास्याने पिलाला घरी आणले आणि पुन्हा कधी त्याला कुरणात आपल्याबरोबर नेले नाही.

# लहान मुलगी आणि अळंब्या

दोन लहान मुली अळंब्यांनी भरलेल्या टोपल्या घेऊन घरी चालल्या होत्या. वाटेत एक रेल्वे रस्ता होता, तो ओलांडून त्यांना जावे लागे.

त्यांना वाटले इंजिन आहे खूप दूर! रूळ भरावावर होते, म्हणून त्या वर चढल्या.

तेवढ्यात इंजिनाचा भक् भक् आवाज त्यांच्या एकाएकी कानी पडला. त्याबरोबर थोरली मुलगी मागे पळाली, पण धाकटी मात्र सरळ रूळ ओलांडीत पुढे धांवत सुटली.

"आता मागे धावू नकोस हं!" मोठीने ओरडून धाकटीला सांगितले.

पण इंजिन इतक्या जवळ आले होते आणि त्याचा आवाज इतका मोठा होत होता की धाकटीला मोठीचे बोलणे धड ऐकू आले नाही. तिला वाटले, ताई आपल्याला परत बोलावतेय — म्हणून ती परतून पुन्हा रूळ ओलांडीत मागे धावू लागली, तेवढ्यात तिला ठेच लागली आणि सगळ्या अळंब्या टोपलीतून खाली पडल्या. तेव्हा ती एक एक अळंबी वेचून टोपलीत टाकू लागली.



इंजिन आता अगदी जवळ आले आणि ड्रायव्हरने शक्य तितक्या जोराने शिटी मारली.

"टाक त्या अळंब्या खाली!" थोरली ओरडली; पण धाकटीला वाटले की ताई आपल्याला अळंब्या नीट वेचायला सांगतेय आणि ती दोन रूळांच्या मधून हातापायावर रांगू लागली.

ड्रायव्हरला इंजिन थांबविता आले नाही — त्याने खूप जोराने शिटी वाजवली पण इंजिन मुलीच्या अंगावरून धडधडत पुढे निघून गेले.

मोठ्या मुलीने किंकाळी फोडली आणि तिला रडू कोसळले; इकडे उतारू डब्यांच्या खिडक्यांबाहेर डोकी काढून पाहू लागले आणि मुलीचे झाले तरी काय ते पाहण्यासाठी बिचारा गार्ड गाडीच्या अगदी टोकापर्यंत धावत गेला.



गाडी गेल्यावर दोन रूळांच्या मधोमध मुलगी अगदी स्वस्थ पालथी पडलेली सर्वांनी पाहिली.

गाडी जरा पुढे गेल्याबरोबर मुलीने डोके वर उचलले; ती उठून बसली – सगळ्या अळंब्या तिने गोळा केल्या आणि ती आपल्या ताईकडे धावत गेली.



# अलुबूखारातील अठी

जेवणानंतर खाण्यासाठी म्हणून आईने बाजारातून काही अलुबूखार आणले आणि एका ताटात घालून ठेवले. वान्याने अलुबूखार कधीच खाल्ले नव्हते, म्हणून तो त्यांचा नुसता वास घेत राहिला. त्याला ती फळे फार आवडली आणि एखादे खावे अशी खूप इच्छा झाली. तो ताटाभोवती घुटमळत राहिला. एकदा खोलीत कुणीच नाही असे पाहून त्याला अगदीच रहावले नाही आणि एक अलुबूखार उचलून त्याने तो गट्ट केला. जेवणापूर्वी आईने फळे मोजली, तो त्यात एक कमी! ते पाहून तिने ती गोष्ट बाबांच्या कानांवर घातली.

सगळे जेवायला बसले, तेव्हा बाबा म्हणाले, "हे पहा मुलांनो! तुमच्यापैकी कुणी एखादा अलुबूखार खाल्ला का?" सगळे म्हणाले, "नाही बुवा! आम्ही नाही खाल्ला." वान्याचा चेहरा गाजरासारखा लाल झाला; तोही म्हणाला, "नाही बुवा! मी नाही खाल्ला!"

बाबा म्हणाले, "तुमच्यापैकी कुणीतरी नक्कीच अलुबूखार खाल्ला आहे, हे काही बरं नाही! पण खरी गोम ती नाही. खरी गोम अशी की अलुबूखारात लहान अठी असते आणि ज्यांना अलुबूखार खायचे कसे ते ठाउक नसतं, ते कधी कधी अठीही गिळतात आणि दुसऱ्या दिवशी नक्की मरतात. मला भीती वाटते ती त्याची!"

वान्या पांढरा फिकट पडला आणि म्हणाला, "पण मी तर अठी काढून खिडकीबाहेर फेकून दिली!"

आणि मग सगळेचजण हसायला लागले, वान्या मात्र रडत बसला.



# पक्षी

वाढदिवसाच्या दिवशी सेर्योझाला भेटीदाखल पुष्कळ खेळणी मिळाली, त्यात भोवरे होते, खेळातले घोडे होते, चित्रेही होती. परंतु सर्वांत विशेष भेट मिळाली ती त्याला त्याच्या मामाकडून! ही भेट म्हणजे पक्षी पकडण्याचे जाळे होते.

छोटया फळीची ती एक चौकट होती. तिला मागे लावलेली एक जाळी होती. फळीवर काही धान्याचे दाणे पसरून जाळे अंगणात ठेवायचे. त्यावर पक्षी बसला रे बसला, की फळी उलटायची आणि त्यावर आपोआप जाळी पडायची. अशी भेटवस्तू मिळाल्यामुळे सेर्योझा खूप खूष झाला आणि ती दाखविण्यासाठी आईकडे पळाला.

आई म्हणाली, "अरे हे खेळणं वाईट आहे! पक्षी पकडून काय करायचं आहे तुला? त्यांना उगाच का छळायचं?"

"नाही ग आई! मी त्यांना पिंजऱ्यात ठेवीन! मग ते छान छान गातील! मी त्यांना रोज खायला देईन!" सेर्योझा म्हणाला.

सेर्योझाने चार दाणे घेतले, त्या फळीवर टाकले आणि ते जाळे बागेत ठेवून दिले. तो बराच वेळ तेथे उभा राहिला; पण एकही पक्षी जवळ येईना, कारण त्यांना त्याची भीती वाटत होती. ते जाळ्याजवळ मुळीच फिरकेनात!

नंतर सेर्योझा जेवायला निघून गेला, जाळे जागच्याजागीच होते. जेवून आल्यावर परत येऊन पहातो तो जाळे मिटलेले. आत एका लहानशा पाखराची धडपड चालली होती. सेर्योझाला खूप आनंद झाला, त्याने त्याला उचलले आणि घरी आणले.

"आई! बघ मला छान पक्षी सापडला! बुलबुल दिसतोय! त्याची छाती बघ कशी धडधडतेय!"



"अरे! ही तर देवचिमणी आहे! छळू नकोस हो तिला! नाहीतर आपली सोडूनच दे तिला बघ!"

"नाही ग आई! मी तिला खाऊ घालीन, तिला भरपूर पाणी देईन."

सेर्योझाने चिमणीला पिंजऱ्यात ठेवले; दाणे टाकले; वाटीभरून पाणी ठेवले; मधून मधून पिंजरा स्वच्छ धुतला. दोन दिवस ठीक चालले. पण तिसऱ्या दिवशी तो सगळे विसरून गेला– पाणी ठेवण्याचे राहून गेले.

आई म्हणाली, "पाहिलंस! विसरलास बिचारीला पाणी द्यायला! दे सोडून तिला!"

"नाही ग आई! आता नाही मी विसरणार–हे पहा मी आताच पाणी आणतो आणि पिंजराही धुवून टाकतो."

सेर्योझाने पिंजऱ्यात हात घेतला, आणि पिंजरा धुवायला सुरुवात केली. बिचारी देवचिमणी घाबरली आणि गजांशी धडपडू लागली. पिंजरा धुण्याचे काम एकदांचे संपले, तशी सेर्योझा पाणी आणायला गेला. त्या गडबडीत तो पिंजऱ्याचे दार बंद करायला विसरला. ही गोष्ट आईच्या ध्यानात आली. तिने त्याला हाक मारली.

"सेर्योझा! पिंजऱ्याचं दार आधी बंद कर बघू! नाहीतर तुझी चिमणी बाहेर येईल आणि उगाच दुखापत करून घेईल!"

हे शब्द तिच्या तोंडातून बाहेर पडताहेत न पडताहेत तोच चिमणीला ते चिमुकले दार सापडले, ती आनंदाने बाहेर पडली; तिने आपले चिमुकले पंख पसरले आणि खोलीतून खिडकी-कडे धाव घेतली. खिडकीच्या काचा तिला दिसल्या नाहीत त्यामुळे ती धाडदिशी काचेवर आदळली आणि खिडकीच्या काठावर पडली.

सेर्योझाने धाव ठोकली, चिमणीला उचलले आणि पुन्हा एकदा पिंजऱ्यात नेऊन ठेवले. चिमणी अजूनही जिवंत होती; परंतु ती आता पोटावर आडवी झाली होती, तिने पंख पसरले होते आणि तिला धाप लागली होती. सेर्योझाने पुन:पुन्हा टक लावून तिच्याकडे पाहिले, त्याला एकदम रडू कोसळले.

"आई! आता काय ग करू?"

"बाळा! करण्यासारखं आता काही उरलेलं नाही!"

सेर्योझा सबंध दिवसभर पिंजऱ्याजवळ बसून होता. चिमणी बिचारी तशीच पडून होती, तिचा श्वास जोराजोराने चालू होता; सेर्योझा एकसारखा तिच्याकडे टक लांवून पहात बसून होता. तो निजायला गेला तेव्हा चिमणी जिवंत होती. त्याला बराच वेळ झोपच येईना! डोळे मिटून घेतले की चिमणी पडली आहे, जोरजोराने तिचा श्वास चालला आहे, हे चित्र त्याला दिसू लागे.

सकाळी उठताक्षणीच त्याने पिंजऱ्याकडे धाव ठोकली, त्याने चिमणीकडे पाहिले, चिमणी उताणी पडली होती. आपल्या लहान ताठ पडलेल्या शरीराशी तिने आपले चिमुकले पाय आखडून घेतले होते.

सेर्योझाने पुन्हा म्हणून कधी पाखरे पकडण्याचे नांव काढले नाही.



# वात्रट मुलगा

एक धनगराचा पोर मेंढ्यांची राखण करीत असताना, जसे काही लांडगाच आला आहे, असे सोंग करून मोठ्याने ओरडला, "धावा! धावा! लांडगा आला रे आला!"

त्याबरोबर आसपासचे शेतकरी धावून आले. पहातात तो काय? मुलाच्या सगळ्या थापा! मुलाने हाच प्रकार आणखी दोनतीन वेळा केला, आणि मग एके दिवशी खरोखरीच एक लांडगा येऊन उभा राहिला.

"धावा! धावा! लांडगा आला रे आला!" म्हणून तो घाबरून ओरडला.

पण शेतकऱ्यांना वाटले की मुलगा थापा मारीत आहे; नेहमीचीच ओरड आहे; म्हणून त्यांनी तिकडे मुळीच लक्ष दिले नाही.

लांडग्याने पाहिले की आपल्याला मुळीच भीती नाही. मग काय! त्याने एकामागून एक सगळ्या मेंढ्यांचा फडशा पाडला.



# दोन मित्र



एकदा दोघे मित्र रानातून चालले होते— तेवढ्यात एक अस्वल त्यांच्या अंगावर धावून आले. त्याबरोबर एक मित्र पळाला आणि थेट झाडावर चढून लपून बसला; दुसरा बिचारा खालीच रस्त्यावर राहिला. काय करणार तो? तो झटकन् आडवा झाला आणि मेल्याचे सोंग करून चुपचाप कुशीवर पडून राहिला.

अस्वल अगदी त्याच्या जवळ आले आणि त्याने त्याला हुंगले. त्या मित्राने श्वास अगदी रोखून धरला होता.

चेहरा हुंगल्यावर, अस्वलाला वाटले, हा मनुष्य मेलेला दिसतो आणि ते निघून गेले.

अस्वल गेल्यावर झाडावर चढलेला मित्र खाली उतरला आणि हसत हसत म्हणाला: "काय रे! अस्वलाने तुझ्या कानात काय सांगितले?"

"अरे ते म्हणाले की संकटकाळी मित्रांना सोडून पळून जाणाऱ्या लोकांच्या वाऱ्यालाही उभा राहू नकोस."

# हंस

हंसांचा एक थवा थंड प्रदेशातून उबदार हवेच्या प्रदेशाकडे निघाला होता – एक दिवस गेला, एक रात्र गेली ; दुसरा दिवस गेला, दुसरी रात्र गेली : जराही विश्रांती न घेता तें समुद्रावरून उडत उडत चालले होते. वर आकाशात पूर्णिमेचा चंद्र शीतळ प्रकाश देत होता, खाली समुद्राचे निळे निळे पाणी पसरले होते. पंखांची फडफड करून सगळेच जण अगदी थकून गेले होते, पण जराही न थांबता, ते पुढे पुढेच चालले होते.

मोठे मजबूत हंस सर्वांत पुढे होते, त्यांच्या मागे छोटे छोटे जरा अशक्त हंस चालले होते, आणि सर्वांच्या मागून एक लहानगा हंस चालला होता. त्याची ताकद कमी कमी होत चालली होती. अजूनही तो उडत होता खरा, पण आता आणखी उडणे शक्यच नव्हते. म्हणून त्याने आपले पंख पसरले आणि तो हळू हळू खाली पाण्याच्या जवळ जवळ येऊ लागला. त्याचे मित्र तसेच पुढे चालले होते – अखेर ते चांदण्यात नाहीसे होत चाललेल्या लहानश्या पांढऱ्या ठिपक्यां-प्रमाणे भासू लागले. बिचारा छोटा हंस पाण्यावर उतरला आणि त्याने आपले पंख मिटून घेतले. सभोवार समुद्राची मंद खळबळ चालू होती, लाटा त्याला हळुवारपणे झोके देत होत्या. आता चांदण्याच्या प्रकाशात आकाशात तो थवा एकाद्या अस्पष्ट पांढऱ्या चंद्रकोरीप्रमाणे दिसत होता. रात्रीच्या त्या गंभीर शांत वातावरणात त्याला अजूनही त्यांच्या पंखांची फडफड ऐकू येत होती. अखेर ते गेले, दिसेनासे झाले, तशी त्याने आपली मान वळवून अंगाशी घेतली आणि डोळे मिटले. तो जराही हलला नाही. लाटांबरोबर तो वरखाली होत होता तेवढेच. पहाटेच्या सुमारास मंद वारा सुटला. आणि समुद्रावर छोटया छोटया लाटा उमटू लागल्या, लाटा फुटून पाण्याचे तुषार त्याच्या शुभ्र छातीवर सपके मारीत होते. त्याने डोळे उघडले आणि पाहिले. पूर्वेला आकाशात तांबडे फुटू लागले होते. चंद्र आणि चांदण्याचा प्रकाश मंद झाला होता – हंसाने एक सुस्कारा टाकला, मान वेळावली, पंख फडफडावले आणि तो उडाला, उंच उडाला, आणखी उंच उडाला – पाणी आता खूप खूप खाली राहिले होते. तो झपाट्याने निघाला, पुढे पुढे – उबदार भूमीकडे निघाला, त्याचे मित्र ज्या निःशब्द पाण्यावरून उडत गेले तेच पाणी ओलांडून तो पुढे पुढे चालला होता.

# हत्ती

भारतामधील गोष्ट! एका माहुताजवळ एक हत्ती होता. तो त्याला फार वाईट वागवी, तो त्याला पुरेसे खायलाही घालीत नसे आणि त्याच्याकडून काम मात्र खूप करून घेई. एके दिवशी हत्तीला या गोष्टीची फार चीड आली आणि त्याने माहुताला पायाखाली दाबून ठार केले. माहुत मेला. त्याची बायको बिचारी रडू लागली. तिने आपल्या मुलांना आणले आणि त्यांना हत्तीच्या पायापाशी बसवून ती चिडून म्हणाली, "मेल्या! तू या मुलांच्या बापाला ठार केलंस! आता यांनाही मार!" हत्तीने मुलांकडे पाहिले. नंतर त्याने सर्वांत थोरल्या मुलाला हलकेच आपल्या सोंडेत घेतले आणि पहाता पहाता त्याला काळजीपूर्वक आपल्या पाठीवर बसविले.

पुढे तो हत्ती जन्मभर त्या मुलाच्या आज्ञेत वागला आणि त्याच्या आज्ञेप्रमाणे काम करू लागला!





# चिमणी आणि कोतवाल

घराच्या छपराच्या वळचणीला कोतवाल पक्ष्यांचे एक घरटे होते — मी सहज तिकडे पहात होतो. इतक्यात नर — मादी दोघेही उडून गेले आणि घरटे रिकामे झाले.

कोतवाल दूर गेले होते, तेवढ्यात छपरावरून एक चिमणी आली, घरट्यावर बसली, तिने इकडे तिकडे पाहिले, पंख फडफडावले आणि ती घरट्यात शिरली, मग तिने आपले डोके वर उचलले आणि चिवचिवायला सुरुवात केली.

लवकरच एक कोतवाल परत आला; तो घरट्यात शिरणार तेवढ्यात आपल्या घरात कुणीतरी अगांतुक पाहुणा शिरला

आहे असे त्याला दिसले. त्याने जोरजोराने चिवचिवाट केला, पंखांचा फडफडाट केला, घरट्यावर दोनचार चकरा मारल्या आणि नंतर तो दूर उडून गेला.

चिमणी खुशाल घरट्यातच बसून राहिली – तिचा चिवचिवाट चालूच होता.

नंतर कोतवालांचा एक थवाच तेथे आला. जसे काही त्यांना चिमणीला पहावयाचे होते. आणि ते पुन्हा तेथून उडून गेले.

चिमणी तशीच धिटाईने बसून होती. ती आपली मान ऐटीत इकडून तिकडे हलवी. तिचे गाणे चालूच होते.

कोतवाल पुन्हा आले. त्यांनी घरट्याला काहीतरी केले आणि पुन्हा ते उडून गेले.

त्यांचे येणे जाणे उगाच नव्हते. प्रत्येकाच्या चोचीत चिखल होता. हळू हळू त्यांनी काटक्या भरून भरून घरट्याचे तोंड बुजवायला सुरुवात केली.

ते दूर जायचे, पुन्हा यायचे आणि आणखी थोडा चिखल आत टाकायचे. हळू हळू घरट्याचे दार लहान लहान होऊ लागले.

प्रथम चिमणीची मान, नंतर डोके आणि शेवटी फक्त चोचच तेवढी दिसत होती आणि शेवटी तर काहीच दिसेनासे झाले. तिला कोतवालांनी चिणून टाकले होते आणि घरट्याभोवती चकरा मारीत त्यांचा जोरजोराने चिवचिवाट चालू होता.





# गरुड पक्षीण

समुद्रापासून दूर एका मोठ्या हमरस्त्यावर एका गरुड पक्षिणीने आपले घरटे बांधले होते. तेथे तिची पिले जन्माला आली.

तिने ज्या झाडावर घरटे बांधले होते तेथे बरेचसे लोक काम करीत बसले होते; तितक्यात ती पंजात एक भला मोठा मासा घेऊन उडत उडत आपल्या घरट्याकडे आली. लोकांनी तो मासा पाहिला, त्याबरोबर त्यांनी झाडाला गराडा घातला आणि खूप गोंगाट केला, तिला दगडही मारले.

तिने घाबरून मासा टाकून दिला; त्याबरोबर तो त्या लोकांनी उचलला आणि घराची वाट धरली.

गरुड पक्षीण आपल्या घरट्याच्या कडेशी बसून विश्रांती घेऊ लागली. तिची बाळे मात्र डोकी उंचावून भूक लागली म्हणून रडू लागली.

बिचारी पक्षीण फारच थकली होती, पुन्हा परत समुद्राकडे जाणे तिच्या जीवावर आले होते. म्हणून ती घरट्यात शिरली आणि तिने पिलांना पंखाखाली घेतले, त्यांच्या पिसांवरून चोच फिरवली, पिसे सारखी केली—"बाळांनो! जरा थांबा!" असेच जणू काही ती त्यांना सांगत होती. पण ती त्यांना जितकी चुचकारी तितका त्यांचा गोंगाट वाढतच चालला.

अखेर ती तेथून उडाली आणि वरच्या एका फांदीवर जाऊन बसली.

पण पिलांचा केविलवाणा किलबिलाट आणखी वाढला.

ते पाहून तिने जोराने चीत्कार केला, पंख पसरले आणि मोठ्या मिनतवारीने समुद्राची दिशा धरली.

तिला परतायला खूप संध्याकाळ झाली. ती खालून आणि हळू हळू उडत होती; पण तिच्या पंजात एक मोठा मासा होता.

ती झाडाजवळ आली, पण या खेपेला प्रथम तेथे कोणी लोक आहेत की काय हे तिने नीट पाहिले, नंतर तिने आपले पंख झटदिशी मिटले आणि ती घरट्याच्या टोकाशी येऊन बसली.

पिलांनी चोची वासल्या आणि त्यांच्या आईने माशाचे तुकडे करून आपल्या पिलांना खाऊ घातले.



# शार्क

आफ्रिकेच्या किनाऱ्यापाशी आमची बोट नांगरून पडली होती. दिवस तर मोठा सुंदर होता, समुद्रावरून ताज्या वाऱ्याची झुळुक वहात होती, पण संध्याकाळी हवा बदलली, उकाडा होऊ लागला आणि सहारा वाळवंटाकडून, भट्टीतून यावे तसे वाऱ्यांचे गरमगरम झोत वाहू लागले.

सूर्यास्त व्हायच्या जरा आधी कॅप्टन डेकवर आला. "चला पोहण्याचा तलाव बनवा"– त्याने हुकूम सोडला. त्याबरोबर शीड उतरवून घेण्यासाठी खलाश्यांनी धाडदिशी पाण्यात उड्या घेतल्या. त्यांनी शीड नीट बांधून घेतले. आत पोहण्याचा तलाव तयार झाला.

बोटीवर आमच्याबरोबर दोन मुलगे होते. त्यांनी सर्वांच्या आधी धाडदिशी पाण्यात सूर मारले, पण शिडाखाली खूप गर्दी झाली होती, तेव्हा त्यांनी खुल्या समुद्रात शर्यत खेळायचे ठरविले.

पालींची जोडी जावी तसे ते पाण्यातून चालले होते. पाण्यात एक बोयरा होता, तिकडे कोण आधी पोहोचतो म्हणून त्यांची धडपड चालू झाली.

एक मुलगा दुसऱ्याच्या पुढे गेला, पण तो हळू हळू मागे पडू लागला. डेकवर त्याचे वडील उभे होते, ते गोलंदाज होते, त्यांचे लक्ष त्याच्याकडे होते. मुलगा मागे पडतो आहे असे पहाताच ते ओरडले,

"धीर सोडू नकोस! जरा आणखी जोर कर!"

पण तेवढ्यात डेकवर कोणीतरी ओरडले–

"शार्क!" आणि पाण्यातून सळसळत जाणाऱ्या त्या राक्षसाची पाठ आम्हाला दिसली.

शार्क सरळ मुलांच्याच मागे लागला होता.

"फिरा! परत फिरा! शार्क आहे!!" गोलंदाज ओरडला.

परंतु मुलांना त्याचे शब्द ऐकू आले नाहीत. ते तसेच पोहत पोहत पुढे चालले. पूर्वीपेक्षाही जोरजोराने हंसत खिदळत ते चालले होते.

गोलंदाज डेकला खिळून बसल्यासारखा स्तब्ध उभा होता. त्याचा चेहरा पांढरा फटक पडला होता.

खलाशांनी पाण्यात नाव सोडली; ते नावेत चढले आणि सारी ताकद लावून वल्ही मारीत ते मुलांकडे निघाले. पण मुले दूर होती. आणि शार्कला आणखी २० पावलांचेच काय ते अंतर कापायचे उरले होते.

आमचे इशारे मुलांनी ऐकले नव्हते. शार्कही त्याच्या दृष्टीस पडला नव्हता, पण एकजणाने मागे वळून पाहिले आणि त्याची किंकाळी आमच्या कानी आली. ते दोघे फुटून झपाट्याने बाजूला झाले.

त्या किंकाळीने गोलंदाजाची झापड उडाली. तो झटकन तोफेकडे धावला. तोफेचे तोंड त्याने वळविले. तोफेवर वाकून बरोबर नेम धरला आणि तोफ डागली.

बोटीवर सगळेजण श्वास कोंडून झपाटल्यासारखे उभे होते. काय होणार म्हणून वाट पहात होते.

तोफेचा गडगडाट झाला, गोलंदाज बाजूला आडवा पडला होता, त्याने हाताने आपले तोंड झाकून घेतले होते. शार्कचे काय झाले, मुलांचे काय झाले, ते आम्हाला काहीच दिसत नव्हते—थोडा वेळ धुराआड सगळेच दिसेनासे झाले होते.

पाण्यावरून धूर दूर झाला; आमच्यातून आधी हळूहळू मंद आवाज उठू लागला, पण थोड्याच वेळाने त्याचे रूपांतर आनंदाच्या आरोळीत झाले!

म्हाताऱ्या गोलंदाजाने तोंडावरचे हात दूर केले, तो उठून उभा राहिला, आणि समुद्राकडे पाहू लागला.

मेलेल्या शार्कचे पिवळे धमक पोट पाण्यावर तरंगत होते. दोन चार क्षणातच नाव मुलांपर्यंत पोहोचली आणि तिने त्यांना उचलून परत बोटीवर आणले.



# उडी

बोटीने जगाला प्रदक्षिणा घातली होती आणि आता ती परत मायभूमीकडे निघाली होती. वातावरण शांत होते आणि सर्वचजण डेकवर जमा झाले होते. एक मोठा वानर इकडून तिकडे उड्या मारत होता, आणि सर्वांनाच त्याची गंमत वाटत होती. तो अंगविक्षेप करी, उड्या मारी, वाकुल्या दाखवी, खोड्या काढी. आपल्याकडे सर्वांचे लक्ष वेधले आहे याची त्याला जाणीव झाली होती, हे स्पष्ट होते, कारण तो आता आणखीच खोड्या काढू लागला.

त्याने कप्तानाच्या बारा वर्षे वयाच्या मुलाकडे धाव घेतली, त्याच्या डोक्यावरची टोपी ओढली, आपल्या डोक्यावर चढवली आणि परत धूम टोकली ती थेट डोलकाठीवर! सगळयांनाच हसू लोटले. मुलाला मात्र हसावे की रडावे तेच कळेना; तो बिचारा बोडका तेथेच उभा राहिला. वानर डोलकाठीच्या पहिल्या आडव्या काठीवर जाऊन बसला, त्याने डोक्यावरून टोपी काढली आणि आपल्या पंजांनी आणि दातांनी तिच्या चिंध्या करायला सुरुवात केली. तो मुलाकडे पाही आणि त्याला वाकुल्या दाखवी, त्याला खिजवायचा त्याच्या मनात विचार होतासा दिसले. मुलाने मुठी वळवून त्याला भेडसावण्याचा प्रयत्न केला, आरडाओरड केली, पण वानराने टोपी फाडण्याचा आपला उद्योग चालून ठेवला, नव्हे वाढविला. खलाशी हसायला लागले – आणि मुलाचा चेहरा लालेलाल झाला. त्याने आपला कोट काढून दूर झुगारून दिला आणि वानराच्या मागोमाग डोलकाठीवर चढायला सुरुवात केली. तो झपझप चढून पहिल्या आडव्या काठीपर्यंत पोहोचला आणि वानराच्या हातातून आपली टोपी खेचून घेणार तोच वानराने वरच्या आडव्या काठीवर झेप घेतली.

"थांब! तुला नाही सोडत आता! बघतो कसा सुटतोस ते!" मुलगा मोठ्याने ओरडला आणि आणखी वर चढू लागला.

वानराने हूल दाखवीत दाखवीत त्याला खूप उंच नेले. मुलगा आता या हुलकावणीच्या खेळात पुरता रंगून गेला होता – तो थेट वरपर्यंत चढला – दोघेही आता अगदी वरच्या काठीपर्यंत पोहोचले होते. तेथे पोहोचल्यावर वानराने एका हाताने दोर धरला आणि आडवे होऊन टोपी आडव्या काठीच्या टोकाला लावून दिली आणि अगदी वर धूम ठोकली. आणि तेथे बसून तो मुलाला तोंड वेंगाडून वाकुल्या दाखवू लागला. डोलकाठीपासून टोपी जेमतेम सहासात फुटांवर होती! तेथे पोहोचायचे तर दोर आणि डोलकाठी दोहोंचाही आधार सोडून आडव्या काठीवरून डोंबाऱ्याप्रमाणे चालत जाणे भाग होते.

पण मुलगा आता पक्का हट्टाला पेटला होता, त्याने बेलाशक डोलकाठीचा आधार सोडून दिला आणि कशाचाच आधार न घेता तो आडव्या काठीवरून चालू लागला.

आतापर्यंत डेकवर सगळे खलाशी वानराच्या खोडचा पहात होते, मुलाची गंमत पाहून हंसत खिदळत होते. पण आताचे हे भयंकर दृश्य पहाताच सर्वांच्याच तोंडचे पाणी पळाले. मुलाने दोरही सोडून दिला होता आणि आपले हात लांब पसरून डोंबाऱ्यासारखा तो आडव्या काठीवरून चालला होता. भीतीने खलाशी जागच्याजागी थिजल्यासारखे थबकून राहिले.

जरासे पाऊल चुकण्याचा अवकाश की मुलगा डेकवर आपटून त्याच्या ठिकऱ्या ठिकऱ्या उडणार हे स्पष्ट होते आणि समजा मुलगा टोकाला पोहोचला, त्याने टोपी घेतली, तरीसुद्धा परत फिरून डोलकाठी पुन्हा गांठायची कशी, हा मोठाच अवघड प्रश्न होता.

आता काय होणार म्हणून सर्वांच्या नजरा मुलाच्या प्रत्येक हालचालीवर खिळून राहिल्या होत्या.

आणि तेवढ्यात कोणीतरी मोठ्याने सुस्कारा टाकला.

त्याबरोबर मुलगा शुद्धीवर आला, त्याने खाली पाहिले आणि आता त्याचे पाय लटपटू लागले.

तेवढ्यात बोटीचा कप्तान – त्या मुलाचा पिता – डेकवर आला. त्याच्या हातात बंदूक होती – मिळालीच तर समुद्रावरची पाखरे मारायचा त्याचा हेतु होता. त्याने वर पाहिले आणि त्याला डालकाठीवर आपला मुलगा दिसला – ताबडतोब त्याने आपली बंदूक त्याच्यावर रोखली आणि तो ओरडला:

"मार उडी पाण्यात! मार उडी! नाहीतर गोळी घालीन!"

मुलगा आणखीच गडबडून गेला. वडील काय म्हणत आहेत, हे त्याला कळेना.

"मार उडी ताबडतोब! नाहीतर गोळी घालीन! एक! दोन!.."

बापाने "तीन" म्हणताच मुलाने हात पसरून काठी सोडली आणि धाडदिशी पाण्यात सूर मारला.

एकादा तोफेचा गोळा घुसावा त्याप्रमाणे तो पाण्यात गेला; पण लाटांनी त्याला बुडविण्याच्या आतच पंधरावीस खलाशांनी धडाधड पाण्यात उड्या घेतल्या. वर यायला मुलाला तब्बल चाळीस सेकंद लागले – डेकवरच्या लोकांना तर ते युगच भासले – खलाशांनी त्याला ताबडतोब धरले आणि वर आणले. मुलाच्या नाकातोंडातून कित्येक मिनिटेपर्यंत पाणी वहात होते, परंतु अखेर त्याचा श्वासोच्छवास सुरू झाला.

मुलाचे आता ठीक आहे, हे पहाताच कप्तानाच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहू लागल्या, गळा दाटून आला – कोणीतरी आपला गळा आवळून धरावा तसे! आणि तो तडक स्वतःच्या केबिनकडे निघून गेला. रडताना आपण लोकांच्या नजरेला पडू अशी त्याला भीती वाटत होती!

# सिंह आणि कुत्रा

लंडन शहरातली गोष्ट! तिथे एकदा कोणी एकाने रानटी पशूंचे एक प्रदर्शन भरविले. ते पहायला फी ठेवली होती, किंवा फी न दिल्यास प्रेक्षकाने एखादे कुत्रे घेऊन यावे असा नियम होता. या प्राण्यांना भक्ष्य म्हणून वन्य पशूंच्या पुढचात टाकण्यात येत असे.

एका माणसाला हे प्राणी पहायचे होते, म्हणून त्याने रस्त्यावरून एक लहानसा कुत्रा उचलून आणला. अर्थात त्याला आत सोडण्यात आले आणि त्याबरोबर कुत्र्याला सिंहाच्या पिंजऱ्यात टाकण्यात आले.

तो लहानगा कुत्रा बिचारा पायात शेपटी घालून पिंजऱ्याच्या एका कोपऱ्यात जाऊन लपून बसला! पण सिंहोबा त्याला हुंगण्यासाठी म्हणून अखेर आलेच!

कुत्रा बिचारा पाठीवर लोळण घेऊ लागला. पायावरून तो आपली शेपटी हलवू लागला.

सिंहाने पंजा उचलून त्याला स्पर्श केला आणि त्याला सरळ केले.

तसा तो कुत्रा उडी मारून मागल्या पायावर बसला.

सिंहाने त्याच्याकडे पाहिले, आपले डोके दोनचार वेळा इकडेतिकडे हलविले, पण त्याने पुन्हा मात्र कुत्र्याला स्पर्श केला नाही.

थोड्या वेळाने शिकारखान्याचा धनी आला, आणि त्याने सिंहासाठी थोडे मांस टाकले. सिंहाने त्यातला एक तुकडा फाडून, कुत्र्यासाठी बाजूला ठेवून दिला.

संध्याकाळी सिंह झोप घेण्यासाठी आडवा झाला. तसा तो कुत्राही त्याच्याजवळ आडवा झाला. त्याने आपले डोके सिंहाच्या पंजावर टेकले होते.

तेव्हापासून ते दोघेही त्या पिंजऱ्यात एकत्र राहू लागले. सिंहाने त्या कुत्र्याला जराही कधी हात लावला नाही. तो त्याच्याबरोबर खात-पीत असे, झोपत असे, इतकेच काय पण खेळे सुद्धा.

एके दिवशी एक सद्गृहस्थ तेथे आले आणि हा आपल्याच कुत्रा आहे, हे त्यांनी ओळखले. शिकारखान्याच्या मालकाला त्यांनी तसे सांगितले आणि "कुत्रा परत करा" म्हणून मागणी केली. अर्थात मालकही त्याला कबूल झाला. पण कुत्र्याला पिंजऱ्यातून बाहेर काढण्यासाठी त्यांनी त्याला "यूं यूं" करताच सिंहाने मोठ्याने गर्जना केली, त्याची आयाळ ताठ झाली.

तो लहानगा कुत्रा आणि तो सिंह त्या पिंजऱ्यात वर्षभर एकत्र नांदले.

वर्षाच्या आतच तो कुत्रा आजारी झाला आणि मेला. तेव्हा सिंहानेही सारे खाणेपिणे सोडून दिले. तो त्याच्याजवळ जाऊन त्याला हुंगू लागला आणि पंजाने त्याच्या अंगाला स्पर्श करून त्याला चाटू लागला.

कुत्रा मेला हे त्याला कळून येताच तो एकदम उठला, त्याची आयाळ ताठ झाली, तो पाठीवर शेपटी आपटू लागला, त्याने धाडदिशी पिंजऱ्याच्या गजांवर अंग टाकले आणि तो गजांचे आणि जमिनीचे चावे घेऊ लागला.

हा प्रकार, ह्या गर्जना, सारा दिवसभर चालू होत्या आणि अखेर तो त्या कुत्र्याच्या शवाजवळ येऊन स्वस्थ बसून राहिला–मालकाने ते शव उचलून नेण्याचा खूप प्रयत्न केला; पण सिंहाने कोणाला जवळ येऊ दिले नाही.

दुसरा एखादा कुत्रा दिला तर कदाचित सिंह आपले दुःख विसरून जाईल असा विचार करून मालकाने दुसरा एक जिवंत कुत्रा आत सोडला–परंतु सिंहाने त्याला ताबडतोब फाडून त्याचे तुकडे तुकडे करून टाकले. नंतर त्याने आपल्या लहानग्या मृत मित्राला कुशीत घेतले आणि तो जराही न हालता पाच दिवसपर्यंत त्याच्याजवळ पडून राहिला.

सहाव्या दिवशी तो सिंह मरून पडला होता!

## अनुक्रमणिका

प्रख्यात रशियन लेखक ल्येव तल्स्तोय (१८२८-१९१०) ह्यांनी लहान मुलांसाठी अनेक गोष्टी लिहिल्या होत्या. जागतिक ललित साहित्याच्या सुवर्ण भांडारात त्यांनी भर घातली आहे.

चित्रकार पाखोमोव ह्यांनी ह्या पुस्तकातील चित्रे रेखाटली आहेत.

ल्येव तल्स्तोय ह्यांनी मुलांसाठी लिहिलेल्या सर्वोत्कृष्ट कथा ह्या पुस्तकात समाविष्ट करण्यात आल्या आहेत.

